**मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांच्या आस्थापनेवरील ४ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१७/प्र.क्र.८९/परि-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. २८.०४.२०१७.

वाचा :- १) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी १२७४/२-XXXV,(TR)मुंबई, दि. २०.९.१९७७
२) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी २०१४/४४/प्र.क्र.३२/परि-५, दि. ३.११.२०१५
३) सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांचे म.जा.क्र.३२९/२०१७ दि. १०.४.२०१७
४) सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांचे म.जा.क्र./२०१७ दि. २०.४.२०१७
५) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १०.२.२०१७

**प्रस्तावना :-**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांच्या आस्थापनेवर संदर्भाधिन क्र. १ वरील दि. २०.९.१९७७ अन्वये एकूण १३ पदे निर्माण केली आहेत. त्यापैकी ९ पदे स्थायी असून ४ पदे अस्थायी असल्याचे संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये कळविले आहे. संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयानुसार ४ अस्थायी पदांना दि. १.९.२०१५ ते ३१.८.२०१६ पर्यंत (१ वर्ष) पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर ४ अस्थायी पदांची मुदत दि. ३१.८.२०१६ रोजी संपली असून सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांनी एकूण ४ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत शासनास विनंती केली आहे. प्रस्तुत ४ अस्थायी पदांना माहे सप्टेंबर २०१६ पासून मुदवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव तांत्रिक कारणास्तव शासन स्तरावर पाठविलेला नव्हता. त्यामुळे सदर पदांना १.९.२०१६ पासून मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे यांच्या आस्थापने वरील खालील ४ अस्थायी पदांना दि. १.०९.२०१६ ते ३०.९.२०१७ पर्यंत १ वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरीत निकाली काढणे, निकाली काढलेल्या दाव्यांचे माहे मे २०१७ आणि ऑगस्ट २०१७ अखेरचे विवरणपत्र शासनास सादर करणे तसेच मार्च २०१६ रोजी प्रलंबित असलेल्या दाव्यातील ५० टक्के प्रलंबित दावे निकाली काढल्याचे दिसून न आल्यास पुढील मुदतवाढ मिळणार नाही या अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नांव | पद संख्या | पदे निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | लिपिक-टंकलेखक | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१८३/६(i)TRA-६, दि. १८.१०.१९८४ |
| २. | टंकलेखक | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१८३/६(i)TRA-६, दि. १८.१०.१९८४ |
| २. | बेलिफ | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१७८/३ TRA-६, दि. ०७.०८.१९८० |
| ३. | शिपाई | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/१७८/३ TRA-६, दि. ०७.०८.१९८० |
| **एकूण पदे** | | **४** | |

३. राज्यातील मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांना शासन निर्णय गृह विभाग क्र. एमसीटी-०२०४/१७५५/सीआर-२१/परि-५, दि. २५.६.२००४ अन्वये वित्त विभाग, शासन निर्णय दि. १०.०९.२००१ च्या तरतूदीतून म्हणजेच पदाच्या आढावा घेण्यापासून वगळण्यात आले आहे. त्यामुळे पदांचा आढावा घेण्याची आवश्यकता नाही, मात्र नवीन पद निर्मितीस शासनाची मान्यता घ्यावी लागेल.

४. या बाबीवरील होणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (००) ८००, इतर खर्च, (००) (०१) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण (२०४१ ०१२५)" या लेखाशिर्षाखालील सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ. पु. क., दि. १० फेब्रुवारी २०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०४२८१४३६०७६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.04.28 14:38:21 +05'30'

(द. ह. कदम)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रति,**

१. जिल्हा व सत्र न्यायाधिश, पुणे
२. सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, पुणे
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव, (बीयुडी-१/ परिवहन-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती / परिवहन-५.